एबाविसेयो अंतर्गत अंगणवाडयांना ग्राम बाल विकास केंद्र (VCDC) मार्गदर्शीका पुरविणे बाबत ..

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन परिपत्रक ,क्रमांक :एबावि २०११ / प्र.क्र. १७० /का-५

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ३० जून, २०११

वाचा:- आयुक्त महिला व बाल विकास पुणे यांचे पत्र क्र. मबावि/एबाविसेयो/का-२/२७५०/२०११ दिनांक २७.६.२०११

**शासन निर्णय :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत पोषण आहारातील ०.०८ पैसे तरतूदीतून ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील ७८६९९अंगणवाडयांना प्रत्येकी २ प्रमाणे १५७३९८ सचित्र माहिती पुस्तिका महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांचे सन २०१०-११ या वर्षाचा दर करारानुसार दर प्रति नग प्रति पुस्तिका रू ११.२४ प्रमाणे खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रू १,७५,०८,९५४/- (अक्षरी रू एक कोटी पंचाहत्तर लाख आठ हजार नऊशे चौपन्न फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर मंजूरी खालील अटीवर देण्यात येत आहे.

१) आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांनी या वस्तुची खरेदी महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाचे दर करार / निश्चित केलेल्या दरानुसार करण्यात यावी.

२) पुरवठादाराने मागणी प्रमाणे निश्चित केलेल्या ठिकाणी मालाचा पुरवठा करण्यात यावा. वस्तुचा विनिर्देश (specification) नुसार पुरवठा करण्यात आलेला आहे याची खात्री करण्यात यावी.

३) तसेच खरेदी / वाटप / पुरवठा यामध्ये अनियमितता झाल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांची राहील.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. एक्स-१ मुख्यलेखाशिर्ष २२३६-पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण,१०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम नागरी (०१) पोषण आहार कार्यक्रम (०१ ) (०१) पोषण आहार कार्यक्रम- (२२३६ ०१८ १ ) -१९ आहार खर्च आणि २२३६, पोषण आहार , ०२ पोषक अन्न व पेय वितरण , १०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम (०३), जिल्हा परिषदांना अनुदान, (०३) (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (मानधन व आहार खर्च) (राज्य आरोग्य, पोषण आहार निधीतून भागविलेली रक्कम ) (कोषागारातून देय) (२२३६००२७) १९- आहार खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण , संवितरण व नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक खर्चनि-२००६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दिनांक २०.४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शं.शा.पढाळ )
उप सचिव ,महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय , महाराष्ट्र राज्य, पुणे
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (महिला व बाल विकास आयुक्तालय पुणे यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत), (महिला व बाल विकास आयुक्तालय पुणे यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (महिला व बाल विकास आयुक्तालय पुणे यांचे मार्फत)
सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा) महिला व बाल विकास आयुक्तालय पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)